**“राज्यातील अभियांत्रिकी महाविद्यालये तसेच तंत्रनिकेतने व अन्य शैक्षणिक व संशोधन संस्थामधील विद्यार्थ्यांना राज्याच्या विकासात सहभागी करुन घेण्याची योजना...”**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्रशिक्षण विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : बैठक ३६११/(५६/१५)/तांशि २**

मंत्रालय विस्तार भवन,मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २५ ऑक्टोबर, २०१८

<u>**संदर्भ**</u> :- १. उच्च व तंत्र शिक्षण, शासन निर्णय क्रमांक : बैठक ३६११/(५६/१५)/तांशि २, दिनांक १३/१/२०१६

२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक: डिएपी-१०१६/प्र.क्र.८३/का-१४८१, दिनांक ०७/०४/२०१६

३. अध्यक्ष, सल्लागार समिती, उन्नत महाराष्ट्र अभियान यांनी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना लिहीलेले दिनांक ०४/०५/२०१७ चे पत्र.

४. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे क्रमांक १७/ डिटीई/ एसपीएफयु/ UMA/१७-१८/४८, दिनांक ११/०७/२०१७ चे पत्र.

<u>**प्रस्तावना :**</u>

राज्यातील उच्च व तंत्र शिक्षण संस्थांच्या मदतीने राज्यातील विविध सामाजिक व विकासाच्या दैनंदिन जीवनातील समस्यांची उकल करुन त्यावर तोडगा काढण्याच्या हेतूने राज्यातील दर्जेदार शैक्षणिक संस्था, विविध शासकीय यंत्रणा ( जिल्हा परिषद, महानगर पालिका, नगर पालिका,पंचायत समिती, जिल्हा विकास आणि नियोजन विकास यंत्रणा इ.) यांच्या दरम्यान परस्पर समन्वय सहकार्य व वृध्दींगत करुन त्याद्वारे संशोधनाच्या माध्यमातून विविध योजनांच्या अंमलबजावणीच्या प्रकियेला नविन स्वरुप देऊन स्थानिक पातळीवरील विकासाच्या प्रश्नांवर तंत्रज्ञानाचा वापर करुन उपाय शोधण्यासाठी संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये ***“उन्नत महाराष्ट्र अभियान”*** योजना राबविण्यास संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. दिनांक १३/०१/२०१६ रोजीच्या शासन निर्णयामध्ये सदरच्या योजनेच्या अनुषंगाने आवश्यक निधीबाबत केलेल्या तरतुदीच्या अनुषंगाने नियोजन विभागाने संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय निर्गमित केलेला आहे. सदर शासन निर्णयामध्ये खालीलप्रमाणे तरतुद आहे :

*“२.(१) जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण)अंर्तगत राबविण्यात येत असलेलया नाविन्यपुर्ण योजनांसाठीच्या राखीव निधीतुन उन्नत महाराष्ट्र अभियानासाठी निधी मागणी प्रस्ताव*

*तंत्रज्ञान व विकास कक्ष प्रमुख यांनी जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती यांचेकडे सादर केल्यावर, त्यानुसार जिल्हयाच्या नाविन्यपुर्ण योजनेकरीता राखीव असलेल्या निधीच्या कमाल २५% पर्यंत इतका निधी जिल्हाधिकारी यांचे मार्फत तंत्रज्ञान व विकास कक्ष यांना उपलब्ध करुन देता येईल."*

उपरोक्त तरतूद ही सदर अभियानाच्या त्रिस्तरीय अंमलबजावणी रचनेतील तिस-या स्तरावर कार्य करणा-या (संस्था) -तंत्रज्ञान आणि विकास कक्ष॰ यांना उपलब्ध करून देण्यात येणार आहे. तथापि, सर्वोच्च पातळीवर कार्य करणा-या -सल्लागार समिती॰ आणि मध्यम स्तरावरील -प्रकल्प समन्वय कक्ष॰ यांच्या दैंनंदिन प्रशासकीय कामकाजासाठी निधीबाबतची कोणतीही तरतूद उपरोक्त शासन निर्णयामध्ये करण्यात आलेली नाही. त्याअनुषंगाने, संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये अध्यक्ष, सल्लागार समिती, उन्नत महाराष्ट्र अभियान यांनी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचेकडे निधी उपलब्ध करून देण्याबाबत विनंती केलेली असल्याचे संदर्भ क्रमांक ४ येथील पत्रान्वये संचालनालयाने शासनास अवगत केलेले आहे. आय आय. टी. पवई ही नामांकित अग्रगण्य संस्था असून उन्नत महाराष्ट्र अभियान या कार्यक्रमाची परिणामकारकरित्या अंमलबजावणी राज्यात करावयाची असल्यास या संस्थेचे मार्गदर्शन उपयुक्त ठरते. यासाठी त्या संस्थेने मागणी केलेला निधी उपलब्ध करुन देणे गरजेचे आहे.

त्याअनुषंगाने, उन्नत महाराष्ट्र अभियान राबविण्यासाठी सर्वोच्च पातळीवर असलेल्या सल्लागार समितीच्या दैंनंदिन प्रशासकीय कामकाजाच्या अनुषंगाने आवश्यक तो खर्च उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अर्थसंकल्पीत निधीमधून मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. **"उन्नत महाराष्ट्र अभियान"** योजनेच्या सर्वोच्च पातळीवर कार्य करणा-या -सल्लागार समिती॰ आणि मध्यम स्तरावर कार्य करणा-या -प्रकल्प समन्वय कक्ष॰ यांच्या दैंनदिन प्रशासकीय कामकाजासाठी आवश्यक खर्चाची तरतूद करण्याच्या अनुषंगाने या विभागाच्या दि.१३/१/२०१६ च्या शासन निर्णयामधील -परिच्छेद क्र.९-निधी॰ मध्ये खालील उप परिच्छेद त्याखाली नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून समाविष्ट करण्यात येत आहे :-

*"उन्नत महाराष्ट्र अभियान राबविण्यासाठी -सल्लागार समिती॰ व -प्रकल्प समन्वय कक्ष॰ यांचे स्तरावर आवश्यक दैंनंदिन प्रशासकीय खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक ती तरतूद सल्लागार समितीस उच्च व तंत्रशिक्षण विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात येईल."*

**अटी व शर्ती :-**

- उन्नत महाराष्ट्र अभियान योजनेंतर्गत देण्यात येणारा निधी संपूर्णतः संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिनस्त असेल आणि प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी सल्लागार समिती व प्रकल्प समन्वयक कक्ष यांच्या आवश्यकतेनुसार तो वितरीत करण्यात येईल.

- संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आर्थिक वर्ष संपल्यानंतर प्राप्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास पाठविणे आवश्यक राहील.
- प्रकल्प अंमलबजावणीसाठी ज्या बाबींवर खर्च करणे अपेक्षीत आहे त्याबाबत संचालनालयातील प्रकल्प अंमलबजावणी कक्षाने खर्चाच्या बाबींची स्थायी यादी तयार करून त्यास सल्लागार समितीची मान्यता घ्यावी. या यादीमधील बाबींवर विहीत पद्धतीने आणि वित्तीय नियमानुसार खर्च करण्यास संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे सक्षम प्राधिकारी असतील.
- प्रकल्प अंमलबजावणीसाठी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना जो निधी  प्राप्त होणार आहे त्यासाठी त्यांनी स्वतंत्र बँक खाते उघडून त्यामधून निहीत पद्धतीने सर्व व्यवहार करावेत.
- या योजनेच्या अनुषंगाने केंद्र व राज्य शासनाच्या विविध यंत्रणा आणि विभाग यांच्याकडून प्रकल्प अंमलबजावणी विषयक कामकाजासाठी काही निधी उपलब्ध करून दिल्यास सल्लागार समितीच्या मान्यतेने तो या बँक खात्यात जमा करता येईल आणि निधी उपलब्ध करून देणा-या यंत्रणेच्या/ विभागाच्या मार्गदर्शक तत्वांनुसार तो प्रकल्पाच्या अंमलबजावणीविषयक कामांसाठी खर्च करता येईल.
- सदर लेख्यांच्या संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आर्थिक वर्ष संपल्यानंतर सनदी लेखापालांमार्फत लेखा परिक्षण करून घ्यावे आणि सल्लागार समितीच्या निदर्शनास हा अहवाल आणावा. सल्लागार समितीच्या सहमतीनंतर लेखा परिक्षण अहवाल शासनास सादर करण्यात यावा.
- सदर लेखे हे लेखा व कोषागारे संचालनालय तसेच भारताचे महालेखापाल यांच्याकडून होणा-या लेखा परिक्षणास पात्र असतील.
- सल्लागार समितीने मान्य केलेल्या प्रयोजनाव्यतिरिक्त इतर बाबींवर खर्च करण्यास मान्यता देण्याचे अधिकार प्रशासनिक विभागास असतील.
- प्रकल्प अंमलबजावणीसाठी संचालनालयात कोणतेही नवीन पद निर्माण करता येणार नाही. मात्र कंत्राटी पद्धतीने मनुष्यबळ उपलब्ध करून घेता येईल.
- दैंनंदिन कार्यालयीन कामकाज, प्रवास भत्ता, वाहन व्यवस्था, संगणक खर्च इत्यादीबाबत शासनाच्या विहीत पद्धतीनुसार खर्च करण्यात यावा.
- सल्लागार समितीच्या सदस्यांना उपस्थितीचे भत्ते व प्रवास खर्च अनुज्ञेय असल्यास त्याबाबत सल्लागार समिती निर्णय घेईल.
- प्रकल्प अंमलबजावणी कक्षाच्या निर्मितीसाठी आवश्यक त्या भौतिक सोयीसुविधा निर्माण करण्यासाठी संचालनालयाने शासनाच्या विहीत पद्धतीनुसार आवश्यक ती कार्यवाही

करावी. निधीचा उपयोग केवळ प्रकल्प अंमलबजावणी करता असेल याची सर्व संबंधीतांनी दक्षता घ्यावी.

- या संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाचे, सूचनांचे अनुपालन करणे सर्व संबंधीतांना बंधनकारक राहील.
- सल्लागार समितीने नियुक्ती केलेल्या कोणत्याही कर्मचाऱ्याच्या नियुक्ती, वेतन व भत्ते व तद्नुषंगिक बाबींची जबाबदारी राज्यशासनाची राहणार नाही. तसेच, याअनुषंगाने न्यायालयीन प्रकरणे उद्भविल्यास त्याची जबाबदारी सल्लागार समितीची राहील.
- या योजनेंतर्गत वर्षभरात झालेल्या कामगिरीचा आढावा घेऊन सविस्तर अहवाल राज्य शासनास सादर करण्याची जबाबदारी सल्लागार समितीची राहील.

२. यानुषंगाने, **"उन्नत महाराष्ट्र अभियान"(UNNAT MAHARASHTRA ABHIYAAN)** या नावाची योजना वार्षिक कार्यक्रम २०१८-१९ मध्ये तंत्रशिक्षण उप विभागांतर्गत MPSIMs या प्रणालीमध्ये अंतर्भूत करण्यात यावी. या योजनेवरील खर्चाची तरतूद अर्थसंकल्पात करण्यासाठी संचालक, तंत्रशिक्षण यांनी नवीन लेखाशिर्ष उघडण्याचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

४. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३०८/व्यय-५, दिनांक १७/१०/२०१८ अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१०३०१४५०२०७८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Bhaskarrao Avhad

Digitally signed by Prakash Bhaskarrao Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e09e7338f45626229cb6381e8154da93814d3127e9859a46e544f505defcd004, cn=Prakash Bhaskarrao Avhad
Date: 2018.10.30 17:11:29 +05'30'

**(प्रकाश आव्हाड)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण)/मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
४. मा. सर्व मंत्री/सर्व मा. राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. सहसचिव/उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.

७. सर्व विभागीय आयुक्त,

८. सर्व जिल्हाधिकारी,

९. सर्व जिल्हा नियोजन अधिकारी,

१०.सर्व संबंधित सदस्य ( संचालनालया मार्फत)

११.संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय/सर्व सहसंचालक

१२.अवर सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई -३२

१३.संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई § ३२

१४.निवड नस्ती- तां.शि.-२